महाराष्ट्र विकास सेवा गट-अ मधील अधिकाऱ्यांच्या पदस्थापना.

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग
## शासन आदेश क्रमांक : मविसे-१०१७/प्र.क्र.७१(भाग-१)/२०१७/आस्था-३,

बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ, मुंबई - ४०० ००१.
तारीख : ०४ जुलै, २०१७.

**संदर्भ** : शासन आदेश, ग्राम विकास विभाग, क्र.मविसे-१०१७/प्र.क्र.७१/२०१७/आस्था-३, दिनांक २६.५.२०१७

**शासन आदेश :-**

सार्वजनिक सेवेच्या हितार्थ महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतुदीनुसार बदली करण्यास सक्षम असलेल्या प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने आणि उक्त अधिनियमाच्या कलम ४(४) व ४(५) मधील तरतुदीनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांच्या पूर्वमान्यतेने या विभागातील खालील अधिकाऱ्यांच्या विनंतीनुसार त्यांच्या बदल्यांचे आदेश शासन देत आहे. बदलीनंतर संबंधित अधिकाऱ्यांची नियुक्ती त्यांच्या नावासमोरील स्तंभ क्र.३ मध्ये दर्शविलेल्या पदावर करण्यात येत आहे :-

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नाव, सध्या धारण केलेले पद व ठिकाण | बदलीने पदस्थापनेचे पद व ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) |
| १. | श्री.एस.एम. गायकवाड, तत्कालिन गट विकास अधिकारी, पंचायत समिती, भोर, जि.पुणे. (सध्या नियुक्तीशिवाय) | गट विकास अधिकारी, पंचायत समिती पाटण, जि.सातारा. | रिक्त पदी |
| २. | श्री.वाय.एस. भांड, तत्कालिन गट विकास अधिकारी, पंचायत समिती, अहेरी, जि.गडचिरोली. (सध्या नियुक्तीशिवाय) | गट विकास अधिकारी, पंचायत समिती धानोरा, जि.गडचिरोली. | रिक्त पदी |

२. संबंधित अधिकाऱ्यांनी त्यांच्या नवीन पदाचा पदभार त्वरीत स्वीकारावा. तसेच त्यांनी अनधिकृत रजेवर जाऊ नये. त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभागाच्या क्रमांक : सीडीआर १०८२/२५६७/२८/अकरा, दिनांक ३०.८.१९८२ च्या परिपत्रकाकडे वेधण्यात येत आहे. त्यात दिलेल्या सूचना लक्षात घेऊन बदली रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास, ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील याची त्यांनी नोंद घ्यावी.

३. संबंधित विभागीय आयुक्त / मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी बदली झालेल्या अधिकाऱ्यांना त्यांच्या सध्याच्या पदभारातून तात्काळ कार्यमुक्त करावे व त्यांच्या नियुक्तीच्या जागी तात्काळ रुजू होण्यास सांगावे.

४. संबंधित अधिकाऱ्यांनी नवीन नियुक्तीच्या ठिकाणी हजर व्हावे व पदभार स्वीकारल्याचा दिनांक शासनास कळवावा. जे अधिकारी कार्यमुक्तीनंतर विहित कालावधीत बदली झालेल्या पदावर रुजू होणार नाहीत, अशा अधिकाऱ्यांविरुध्द संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी विभागीय आयुक्तांमार्फत शिस्तभंग विषयक कार्यवाहीचा प्रस्ताव शासनास सादर करावा.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०७०४१६३०३३२९२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ananda Shankar Shendage

Digitally signed by Ananda Shankar Shendage
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development And Water Conservation Dept, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0db7067f83b51744741b4485650edc8705560188be635df819605b4913ead056, cn=Ananda Shankar Shendage
Date: 2017.07.04 17:55:27 +05'30'

(आ.शं. शेंडगे)
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) मा. मंत्री ( ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव
२) मा. राज्यमंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव
३) मा. सचिव (ग्राम विकास व पंचायत राज) यांचे स्वीय सहायक.
४) विभागीय आयुक्त, पुणे / नागपूर.
५) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पुणे / सातारा / गडचिरोली.
६) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे / सातारा / गडचिरोली.
७) महालेखापाल - १/२ (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
८) संबंधित अधिकारी (संबंधित विभागीय आयुक्त / मुख्य कार्यकारी अधिकारी यांचेमार्फत.)
९) कार्यासन, आस्था-२, ग्राम विकास व जलसंधारण विभाग
१०) निवड नस्ती (कार्यासन, आस्था-३), ग्राम विकास व जलसंधारण विभाग.